२०१६-१७ या शैक्षणिक वर्षाकरीता शहरातील नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याकरिता संस्था/शाळांची निवड करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः नानिशा-२०१६/प्र.क्र.५८/का.१२
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ९ नोव्हेंबर, २०१६.

वाचा:-

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र नानिशा-२०१६/प्र.क्र.५८/का.१२, दि. ०१ जुलै, २०१६.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.नानिशा-२०१६/प्र.क्र.५८/का.१२, दि. २५ जुलै, २०१६.
३) आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्रनानिशा-२०१६/प्र.क्र.५८/का.१२,दि.३१ ऑगस्ट, २०१६.
४) आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.नानिशा-२०१६/प्र.क्र.५८/का.१२,दि. २५ ऑक्टोबर, २०१६.
५) प्रकल्पअधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट यांचे पत्र क्र.जा.क्र./शा.आ.आ./का.२/२७५७/२०१६, दि.२७.०९.२०१६

प्रस्तावना:-

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबतची योजना दि.२८.०८.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे. सदर योजनेतंर्गत करण्यात आलेल्या सुधारणांस अनुसरून सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षात इयत्ता १ ली ते इयत्ता ५ वी करिता अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यासाठी योजनेतंर्गत निवड होण्याबाबत इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शिक्षण संस्था/शाळांमार्फत प्राप्त झालेल्या प्रस्तावांची तपासणी संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचेवतीने तपासणी करण्यात आली होती. प्रकरणी अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी शासनास शिफारस केलेल्या प्रस्तावांची योजनेतंर्गत गठीत राज्यस्तरीय सचिव समितीच्या पाच बैठकांमध्ये छाननी करण्यात आली. त्यानुसार सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षाकरिता अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण देण्याकरिता विहित निकष पुर्ण करीत असलेल्या संस्था/शाळांची निवड करण्यास संदर्भाधिन क्र. १ ते ४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. तसेच विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून सदर शाळांमध्ये मंजूर करण्यात आलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत प्रवेशित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. याव्यतिरिक्त किनवट प्रकल्पांतर्गत प्रस्तुत योजनेस पालकांचा उत्सफुर्त प्रतिसाद व पाल्यांना प्रवेश देण्यासाठीची आग्रही मागणी विचारात घेता ३०० विद्यार्थ्यांचे अतिरिक्त झालेले प्रवेश नियमित करण्याबाबत प्रकल्प अधिकारी, किनवट यांनी संदर्भाधिन क्र.५ येथील पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला होता. त्यानुसार सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने प्रत्यक्षात प्रवेशीत विद्यार्थी संख्येच्या प्रमाणात अशा शाळांना नामांकीत योजनेतंर्गत वाढीव विद्यार्थी संख्या मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

सन २०१६-१७ या **शैक्षणिक वर्षाकरीता** अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबत संदर्भाधिन क्र. १ ते ४ येथे नमूद शासन निर्णयान्वये निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांपैकी खालील तीन शाळांमध्ये प्रत्यक्षात प्रवेशीत विद्यार्थी संख्येच्या प्रमाणात रकाना क्र. ४ मध्ये दर्शविण्यात आल्याप्रमाणे वाढीव विद्यार्थी संख्येस शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नामांकीत शाळेचे नाव व पत्ता | यापूर्वी मंजूर विद्यार्थी संख्या | वाढीव मंजूर करण्यात येत असलेली विद्यार्थी संख्या | एकूण मंजूर विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती.** | | | | |
| १ | इंदिरा इंटरनॅशनल स्कूल, विष्णुपुरी, नांदेड | ५० | १०० | **१५०** |
| २ | वेलिंग्टन इंटरनॅशनल स्कूल, नांदेड | १०० | १५० | **२५०** |
| ३ | सरस्वती इंटरनॅशनल स्कूल, कुर्तडी, जि.हिंगोली | १०० | ५० | **१५०** |

**२. प्रस्तुत नामांकित शाळेत प्रवेश देताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात आले असल्याची खात्री करण्यात यावी :-**

I. संबंधित संस्था/शाळा शासनाला सादर केलेल्या प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे सर्व सोयी सुविधा देण्यास तयार आहेत, याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी खातरजमा करावी व संस्थेकडून तसे हमीपत्र घ्यावे.

II. संस्था/शाळेमार्फत आदिवासी विद्यार्थ्यांसाठी वेगळी तुकडी/वर्ग सुरु करणे अपेक्षित नाही, त्यांच्या सुरु असलेल्या नियमित तुकडी/वर्गामध्येच आदिवासी विद्यार्थ्यांना प्रवेश देणे बंधनकारक राहील.

III. संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी शाळेच्या नावासमोर दर्शविलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत विद्यार्थी प्रवेशित करण्याची दक्षता घ्यावी.

IV. एकाच संस्थेने एकापेक्षा अधिक प्रकल्पातून प्रस्ताव सादर केल्याचे आढळून आलेले आहे. तरी सदर संस्थांमध्ये विद्यार्थी प्रवेशित करताना संस्था ज्या प्रकल्पातील आहे त्या प्रकल्पातील विद्यार्थ्यांना प्रवेशासाठी प्राधान्य देण्यात यावे. उर्वरित प्रकल्पांतून सदर संस्थेमध्ये विद्यार्थी प्रवेशित करताना, सदर संस्थेची वसतीगृह क्षमता तसेच अतिरिक्त वर्ग तुकडीस शालेय शिक्षण विभागाची मान्यता लक्षात घेऊन इतर प्रकल्पांशी समन्वयाने विद्यार्थी प्रवेशित करण्यात यावेत. संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी याबाबत पर्यवेक्षण करावे.

V. ज्या नामांकित शाळांमध्ये सदर योजनेंतर्गत विद्यार्थी प्रवेशित करण्यात आले आहेत अशा नामांकीत शाळांच्या मुख्याध्यापकांसमवेत संबंधित प्रकल्प अधिकारी वा अपर आयुक्तांनी प्रत्येक शैक्षणिक

वर्षात माहे जून, ऑक्टोबर व फेब्रुवारी मध्ये बैठक घेऊन प्रवेशित विद्यार्थ्यांची प्रगती व समस्यांबाबत आढावा घ्यावा.

VI. नामांकित शाळेची निवड झाल्यानंतर पहिल्या सत्रात तसेच माहे नोव्हेंबर नंतर द्वितीय सत्रात संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी नामांकित शाळेस व्यक्तीशः भेट देऊन त्याबाबतचा अहवाल संबंधित अपर आयुक्त; आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक तसेच शासनास सादर करावा.

VII. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का.१३, दि.२८.०८.२००९; आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.नानिशा-२०१५/प्र.क्र.११८/का-१२, दि.२१.०४.२०१५; शासन शुद्धीपत्रक दि.१७.०५.२०१६ तसेच आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र नानिशा-२०१५/प्र.क्र.३८७/का.१२, दि.२७.०६.२०१६ मध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

३. ज्या नामांकित संस्थेत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांस प्रवेश देण्यात येणार आहे, त्या संस्थेबरोबर संबंधित प्रकल्प अधिकाऱ्यांनी करारनामा करावा. यामध्ये मुलांचे शिक्षण, आरोग्य, सुरक्षा, निवास, आहार व अन्य सुविधा तसेच संस्थेच्या प्रस्तावातील सर्व सोयी सुविधा या मुद्यांचा समावेश करण्यात यावा.

४. सदर योजनेची अंमलबजावणी संबंधित प्रकल्प अधिकारी करतील तसेच संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास योजनेचे "पर्यवेक्षकीय अधिकारी" म्हणून व आयुक्त, आदिवासी विकास नाशिक हे "नियंत्रक अधिकारी" म्हणून जबाबदारी पार पाडतील.

५. सदर योजनेसाठी होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

" मागणी क्र. टी- ५
२२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण-
पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना-जनजाती क्षेत्र उपयोजना-
०२- अनुसूचित जमातीचे कल्याण
७९६,जनजाती क्षेत्र उपयोजना- राज्य योजनांतर्गत योजना
(०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना
(०२) (२९)- अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण देणे.
(२२२५ सी-९९९) ३१ " सहायक अनुदाने (वेतनेतर) "

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११११५३२०५०५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarrao Aute
Date: 2016.11.11 15:35:18 +05'30'

(रविंद्र औटे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३) मा.मंत्री, (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
४) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
५) अपर मुख्य सचिव, (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, (शालेय शिक्षण विभाग) यांचे स्वीय सहाय्यक.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर
८) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
९) अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती.
१०) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट, जि. नांदेड
११) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
१२) सर्व संबंधित संस्था/शाळा. (संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत)
१३) निवड नस्ती का-१२.